उच्च शिक्षण संचालनालयांतर्गत शासकीय महाविद्यालये / संस्था /अध्यापक महाविद्यालयात कंत्राटी स्वरुपात कार्यरत असलेल्या सहाय्यक प्राध्यापक व अधिव्याख्यात्यांच्या मानधनात वाढ करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्रशिक्षण विभाग,

शासन निर्णय क्र. एससीपी २०१०/(१३०/१०)/मशि-१

विस्तार भवन, मंत्रालय, मुंबई ४०००३२

दिनांक :०५ मे, २०११.

संदर्भ:- १. उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्र. बैठक १००२/(९१/०२) आस्था १, दि.२५.०७.२००२
२. उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन पूरक पत्र क्र. संकिर्ण १००२/(५५३/०२) आस्था १, दि.२७.०८.२००२
३. उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्र. संकिर्ण १००२/(५५३/०२) आस्था १, दि.११.०७.२००३
४. उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्र. एससीपी १००७/(१६२/०७) मशि २, दि.२९.०६.२००२
५. उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्र. एससीपी २००७/(१७०/०७) मशि २, दि.१०.०६.२००८

प्रस्तावना :- उच्च शिक्षण संचालनालयांतर्गत शासकीय महाविद्यालये /संस्था /अध्यापक महाविद्यालये यातील अधिव्याख्यात्यांची रिक्त पदे कंत्राटी पध्दतीने भरण्यास उपरोक्त संदर्भ क्र. १ ते ५ मधील आदेशातील अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजुरी देण्यात आली आहे. नियमित स्वरुपात कार्यरत अधिव्याख्यात्यांची व कंत्राटी स्वरुपात कार्यरत असलेल्या अधिव्याख्यात्यांची शैक्षणिक अर्हता, कामाचे तास, जबाबदा-या सारख्याच असूनही दोघांच्या तुलनेत कंत्राटी अधिव्याख्यात्यांना मिळणारे मानधन कमी असल्याने त्यांच्या मानधनात वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. या संदर्भात सर्वंकष विचार करुन पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

शासन निर्णय :- शासकीय महाविद्यालये /संस्था /अध्यापक महाविद्यालये यातील कंत्राटी स्वरुपात कार्यरत असणा-या सहाय्यक प्राध्यापकांना सध्या देण्यात येणा-या रु. १२,०००/- इतक्या ठोक मासिक मानधनात सुधारणा करुन ते रु. २४,०००/- करण्यांत येत आहे. तर कनिष्ठ महाविद्यालयात कंत्राटी स्वरुपात कार्यरत असणा-या अधिव्याख्यात्यांना रु. १४,४५०/- इतके ठोक मासिक मानधन मंजुर करण्यांत येत आहे.

२. सदरचे सुधारित मानधन या शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागु होईल. याबाबतचा होणारा खर्च संबंधित संस्थेकरीता वेतनासाठी मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २९०/११/व्यय ५, दि.०७.०४.२०११ च्या मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

४. हा शासन निर्णय शासनाचे संकेतस्थळ WWW. Maharashtra.gov.in यावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय सांकेतांक क्र. २०११०५०६१७११५६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(सदाशिव शिवदास)
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

D:\...\G R.doc

सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण.
सर्व प्राचार्य/संचालक, शासकीय महाविद्यालये /संस्था /विज्ञान संस्था/ अध्यापक महाविद्यालये.
खाजगी सचिव, मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण, मंत्रालय, मुंबई -३२.
खाजगी सचिव, राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण, मंत्रालय, मुंबई -३२.
स्वीय सहाय्यक, सचिव, उच्च व तंत्रशिक्षण, मंत्रालय, मुंबई -३२.
सर्व कार्यासने, उच्च व तंत्रशिक्षण, मंत्रालय, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य १/२, मुंबई / नागपूर.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
वित्त विभाग मंत्रालय, मुंबई -३२.
निवड नस्ती, मशि-१ कार्यासन.